महाराष्ट्र राज्य भारत स्काउटस् आणि गाईडस् मुंबई, या संस्थेस वेतनेतर अनुदान मंजूर करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र :- भास्कागा-२०२५/प्र.क्र.१३/क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ मार्च, २०२५.

वाचा :-

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. एससीजी-२००७/प्र.क्र.१६/माशि-७,दि.२१.११.२००८
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. भास्कागा/उपदान निधी/२०२४-२५/का.५/४०३८, दि.२२.०१.२०२५.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस्, मुंबई या संस्थेस संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये वेतनेतर बाबींकरीता रु.२४,०८,६५०/- (अक्षरी रु. चोवीस लाख आठ हजार सहाशे पन्नास फक्त) इतक्या रकमेस वार्षिक खर्चाकरीता मंजुरी दिली आहे. सदर वेतनेतर खर्चामध्ये कर्मचाऱ्यांचे उपदान व भविष्य निर्वाह निधी, मानद कार्यकर्त्यांचे मानधन, मेळावे इत्यादी बाबींचा समावेश आहे. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस्, मुंबई या संस्थेतील कर्मचाऱ्यांच्या वेतनेतर खर्चाकरिता अनुज्ञेय निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : -

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस्, मुंबई या संस्थेतील कर्मचाऱ्यांच्या वेतनेतर खर्चाकरिता संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये अनुज्ञेय रु.२४,०८,६५०/- (रु. चोवीस लक्ष आठ हजार सहाशे पन्नास फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | अनुदान मान्य बाबी | खर्चाची वार्षिक मर्यादा |
|---|---|---|
| १ | प्रवास व दैनिक भत्ता | रु.६,००,०००/- |
| २ | उपदान व भविष्य निर्वाह निधी | रु.३,८०,०००/- |
| ३ | मानद कार्यकर्त्यांचे मानधन | रु.६०,०००/- |
| ४ | जिल्हा संस्थाना अनुदान | रु. ३,९०,०००/- |
| ५ | कॉन्टिजन्सीज | रु. ३,७८,६५०/- |
| ६ | मेळावे, शिबीरे, चर्चासत्रे इत्यादी | रु. ३,००,०००/- |
| ७ | स्काउट- गाईड नियतकालिके | रु. ३,००,०००/- |
| | **एकूण** | **२४,०८,६५०/-** |

२. सदर खर्च मागणी क्र.ई-३ २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०२ विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०२) बालवीर व वीरबाला महाराष्ट्र छात्र सेना (०२) (०१) बालवीर सेवा व मार्गदर्शन-महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस व गाईडस मुंबई यांना सहायक अनुदाने (अनिवार्य) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२०४ ००३४) या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या तरतदीतून भागविण्यात यावा. सदर तरतूद वितरीत करताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे:-

१) सदर तरतूद ज्या बाबींसाठी व ज्या आर्थिक मर्यादेत मंजूर केली आहे, त्याच बाबींसाठी व त्याच आर्थिक मर्यादेमध्ये खर्च करण्यात यावी.

२) उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार व विहित कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आहरीत करावा.

३) राज्य शासनामार्फत वेळोवळी वित्त विषयक तसेच अनुज्ञेय आर्थिक लाभासंदर्भात (उदा. उपदान इ.) निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/शासन निर्णय वित्तीय नियमावली यातील तरतूदीनुसर वितरीत तरतुदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी, लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ संदर्भ क्र.२७३/व्यय-५ दि.०४.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे..

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१५२३१४४५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA KETAN TONDE

Digitally signed by KAVITA KETAN TONDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=School Education Department, 2.5.4.20=d9d6cb2ca7858ab2922f2f069c1dcf0c59dbd6f04e8ac435f94b342b3c624ecc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a738d4711deb1f586dd1811780ba863704a1ea496ff9ec7d1b6a62b204ab4751, cn=KAVITA KETAN TONDE
Date: 2025.03.29 15:24:33 +05'30'

**( कविता तोंडे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई
६. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक,
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव ( क्रीडा ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, तथा राज्य मुख्य आयुक्त, महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस्, मुंबई, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर
११.लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे.
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१४. राज्य चिटणीस, महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस्, मुंबई.
१५.वित्त विभाग (व्यय-५)/नियोजन विभाग (का. १४७१), मंत्रालय, मुंबई.
१६.अवर सचिव ( अर्थसंकल्प ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८.निवड नस्ती, क्रीयुसे-३